**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम-२०१५ च्या अनुषंगाने राज्यातील सर्व प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टीआरएन-२०१५/प्र.क्र.१९६/१५/१२-अ**
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
तारीख: ३० सप्टेंबर,२०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३ सप्टेंबर,२०११
२) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०११/प्र.क्र.२८७/११/१२-अ,दि. १४ ऑक्टोबर,२०१३
३) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०१४/प्र.क्र.१२०/१४,दि.१३ ऑगस्ट,२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०१४/प्र.क्र.१२०/१४,दि.१२ सप्टेंबर,२०१४
५) शासन निर्णय क्रमांकः टिआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/१४,दि.१ नोव्हेंबर,२०१४
६) महाराष्ट्र शासन अधिनियम क्रमांक ३१, सामान्य प्रशासन विभाग दिनांक २१ ऑगस्ट,२०१५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील पात्र नागरीकांना पारदर्शकरितीने कालबध्द सेवा प्रदान करणे आवश्यक आहे. अशा रितीने सेवा प्रदान करतांना सार्वजनिक प्राधिकरणांमध्ये गतिमानता व पारदर्शकता असणे आवश्यक आहे. तसेच, अशा सेवा पुरविण्यासाठी सार्वजनिक प्राधिकरणांच्या कार्यपध्दतीचे सुलभीकरण करणे,कार्यपध्दतीची पुनर्आखणी करणे, सेवा प्रदान पध्दतीसंबंधीचे विचार मंथन करण्यासाठी व सेवा प्रदान करण्यासाठी नागरिकांसाठी संस्थात्मक यंत्रणा विकसीत करणे तसेच उल्लेखनीय सेवेकरिता उत्तेजन व कसूरी करणाऱ्यास शास्ती करण्याच्या दृष्टीकोनातून दिनांक २१ ऑगस्ट, २०१५ रोजी राजपत्राव्दारे महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ निर्गमित करण्यात आला आहे. या अधिनियमाव्दारे विविध विभागांशी संबंधित सुमारे १६० लोकसेवा अधिसूचित करण्यात आलेल्या आहेत.

या अधिनियमाव्दारे लोकसेवा देणाऱ्या यंत्रणेत अधिकच पारदर्शकता व उत्तरदायित्वाची जाणीव निर्माण होणार आहे. या बाबीचा विचार करता व सदर कायदा अधिक प्रभावी करण्यासाठी लोकसेवा देणाऱ्या विभागांतील अधिकाऱ्यांत सदरहू अधिनयमातील तरतूदी, नियत कालमर्यादा, लोकसेवा देण्यासाठी माहिती तंत्रज्ञानाचा वापर, उचित प्रशिक्षकाची नियुक्ती, शास्ती वसुलीची कार्यपध्दती, महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाचे गठन इ. बाबत जागरूकता होणे अत्यंत आवश्यक आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमातील तरतूदींबाबत शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्यामध्ये जागरूकता यावी व याबाबत सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना माहिती व्हावी यासाठी राज्य प्रशिक्षण धोरण-२०११ च्या अनुषंगाने निश्चित करण्यात आलेल्या प्रशिक्षण कार्यक्रमांनुसार महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम मधील तरतूदींच्या अनुषंगाने नवीन विषयाची तोंडओळख प्रशिक्षण कार्यक्रम सर्व राज्यभरात राबविण्यासाठी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन परिपत्रक :-**

राज्यातील सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण मिळावे यासाठी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये राज्य प्रशिक्षण धोरण-२०११ घोषित करण्यात आले आहे. सदर प्रशिक्षण धोरणानुसार वर्ग-२ व वर्ग-३ च्या अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये ६ महसूली विभागाच्या स्तरावर ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित करण्यात आल्या आहेत. तसेच, वर्ग-४ व

भविष्यात वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देता यावे, यासाठी संदर्भ क्र.३ व४ च्या शासन निर्णयान्वये ३६ जिल्हानिहाय जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित करण्यात आल्या आहेत.

सदर राज्य प्रशिक्षण धोरणाच्या अनुषंगाने सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात ५५,००० राज्य शासन सेवेतील वर्ग-१ ते वर्ग-४ च्या अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याचे उद्दीष्ट (Key Result Area) अंतर्गत निश्चित करण्यात आले आहे.

सदर उद्दीष्टपूर्तीसाठी व प्रशासकीय प्रशिक्षण कार्यक्रम सुरळीतरित्या पार पाडण्यासाठी व संस्थांना मार्गदर्शन करण्यासाठी यशदातील अधिकाऱ्यांना विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे पालक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर पालक अधिकाऱ्यांचे व विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांतील प्रशिक्षकांचे यशदा,पुणे येथे महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम याबाबत एक दिवसीय प्रशिक्षण कार्यक्रम ((प्रशिक्षकांचे प्रशिक्षण) आयोजित करण्यात यावे. याबाबतच्या सूचना खालीलप्रमाणे आहेत.

I. **<u>नामनिर्देशने करण्याची पद्धत :</u>** प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी यशदाने खालीलप्रमाणे प्रशिक्षणार्थी निवडावेत .

| अ.क्र. | प्रशिक्षकांचा प्रकार | प्रशिक्षकांची संख्या | शेरा |
|---|---|---|---|
| १. | संबंधित विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी नियुक्त पालक अधिकारी | ३६*२ = ७२ | यशदाचे पालक अधिकारी(३६) व संसाधन व्यक्ती(Associate Course Director) (३६) |
| २. | संसाधन व्यक्ती | १२ | विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांतील प्रशिक्षक (प्रत्येकी २) |

II. **<u>प्रशिक्षणाचा कालावधी:-</u>** सदरहू प्रशिक्षण कार्यक्रम दि. ३०.०९.२०१५ या दिवशी अनिवासी स्वरूपात व सकाळी ९.३० ते ५.३० या कालावधीत यशदा येथे आयोजित करण्यात यावा.

III. **<u>प्रशिक्षणासाठी सोयी-सुविधा :-</u>** सदरहू प्रशिक्षण कार्यक्रमासाठी ८० ते ९० प्रशिक्षणार्थीची बैठकव्यवस्था होऊ शकेल असे सभागृह, लॅपटॉप / कॉम्पुटर सह प्रोजेक्टर, दोन वेळचा चहा व दुपारचे भोजन इ. व्यवस्था करावी.

IV. **<u>प्रशिक्षणाचे आयोजन :-</u>** राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा सदरहू प्रशिक्षकांच्या प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करतील.

V. **<u>प्रशिक्षणासाठी स्टेशनरी व वाचन साहित्य :-</u>** प्रशिक्षणासाठी नोट पॅड, पेन, वाचन साहित्य म्हणून अधिनियमाची प्रत, प्लॅन ऑफ ॲक्शन व अधिनियम संबंधित प्रपत्रे राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा मार्फत देण्यात येतील.

VI. **<u>प्रशिक्षणासाठी प्रशिक्षक :-</u>** महासंचालक यशदा, उपमहासंचालक राप्रनिमूयं, संचालक राप्रनिमूयं, संचालक,माहिती अधिकार केंद्र, यशदा हे प्रशिक्षक म्हणून काम पाहतील .

VII. **<u>प्रशिक्षणासाठी निधी :-</u>** यशदा स्तरावरील <u>अनिवासी</u> स्वरूपाच्या प्रशिक्षणासाठी राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत आर्थिक तरतुदीतून सामान्य प्रशासन विभागामार्फत निधी देण्यात येईल .

**३.** उपरोक्त प्रशिक्षीत प्रशिक्षकांनी जिल्हानिहाय जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांतील प्रशिक्षकांना प्रशिक्षण द्यावयाचे आहे. तरी सदर प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याच्या अनुषंगाने आवश्यक त्या सूचना सर्व जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे देण्यात येत आहेत.

**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम संदर्भातील जिल्हास्तरावरील प्रशिक्षकांचे प्रशिक्षण**

A.संबंधित जिल्हाधिकारी यांनी खालीलप्रमाणे **नामनिर्देशने** करावीत.

| अ. क्र. | प्रशिक्षकांचा प्रकार | प्रशिक्षकांची संख्या | शेरा |
|---|---|---|---|
| १. | संबंधित जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेचे प्रशिक्षक | ०९ | जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे यापुर्वी प्रशिक्षित प्रशिक्षक |
| २. | जिल्ह्यातील सर्व खात्यांचे अधिकारी | खात्यांची संख्या x २ = एकूण संख्या | ज्यांच्यामध्ये प्रशिक्षणाची आवड व अभिक्षमता आहे असे अधिकारी |
| ३. | ई-जिल्हा प्रकल्प व्यवस्थापक (e-District Project Manager) | १ | -- |

उपरोक्त उल्लेखित संबंधितांची नामनिर्देशने दिनांक १.१०.२०१५ पर्यंत **मा .अपर मुख्य सचिव (सेवा) , सामान्य प्रशासन विभाग व महासंचालक, यशदा, पुणे यांच्याकडे** संबंधित जिल्हाधिकारी यांनी पाठवावीत .

**B. प्रशिक्षकांचे प्रशिक्षणाचा कालावधी व वेळापत्रक :-** उपरोक्त उल्लेखित जिल्हास्तरीय प्रशिक्षकांचे एक दिवसाचे अनिवासी स्वरूपाचे प्रशिक्षण जिल्हास्तरावर सकाळी ९.३० ते ५.३० या वेळेत खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे घेण्यात येईल. महाराष्ट्र लोकसेवा हमी कायद्यासंदर्भातील प्रशिक्षकांचे प्रशिक्षणाचे जिल्हानिहाय वेळापत्रक खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | प्रशिक्षण आयोजनाचा दिनांक |
|---|---|---|
| १ | औरंगाबाद | ०६.१०.२०१५ किंवा ०७ १०.२०१५.किंवा ०८.१०.२०१५ |
| २ | जालना | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३ | परभणी | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ४ | बीड | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ५ | हिंगोली | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ६ | लातूर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ७ | उस्मानाबाद | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ८ | नांदेड | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ९ | मुंबई | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १० | मुंबई उपनगर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ११ | ठाणे | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १२ | रायगड | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १३ | रत्नागिरी | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १४ | सिंधुदुर्ग | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १५ | पालघर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १६ | नागपूर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |

| | | |
|---|---|---|
| १७ | भंडारा | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १८ | गोंदिया | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| १९ | चंद्रपूर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २० | वर्धा | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २१ | गडचिरोली | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २२ | अमरावती | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २३ | यवतमाळ | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २४ | अकोला | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २५ | बुलढाणा | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २६ | वाशिम | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २७ | नाशिक | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २८ | धुळे | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| २९ | जळगाव | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३० | नंदूरबार | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३१ | अहमदनगर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३२ | पुणे | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३३ | सातारा | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३४ | सांगली | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३५ | सोलापूर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |
| ३६ | कोल्हापूर | ०६.१०.२०१५ किंवा ०७.१०.२०१५ किंवा ०८.१०.२०१५ |

**C.<u>प्रशिक्षकांचे प्रशिक्षणाचे आयोजन :-</u>**

यशदा व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था व संबंधित जिल्हाधिकारी एकत्रितपणे सदरहू प्रशिक्षकांच्या प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करतील.

**D.प्रशिक्षकांचे प्रशिक्षणासाठी सोयी-सुविधा :-**

सदरहू प्रशिक्षकांच्या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी ४५ ते ५० प्रशिक्षणार्थींची बैठकव्यवस्था होऊ शकेल असे सभागृह, लॅपटॉप / कॉम्पूटरसह प्रोजेक्टर, (प्रत्यक्ष दराप्रमाणे) दोन वेळचा चहा व दुपारचे भोजन (यासाठी अंदाजे रू.६०/- प्रति व्यक्ती याप्रमाणे ) इ. व्यवस्था करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेची राहील व त्याची देयके सादर केल्यानंतर यशदाकडून त्याची प्रतिपुर्ती संबंधित प्रशिक्षणाच्या दिवशीच करण्यात येईल. संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त सोयी-सुविधा उपलब्धतेबाबत व्यक्तीश: खातरजमा करावी.

**E.प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी स्टेशनरी व वाचन साहित्य :-** प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी नोट पॅड, पेन व वाचन साहित्य म्हणून अधिनियमाची प्रत, प्लॅन ऑफ ॲक्शन व अधिनियम संबंधित प्रपत्रे यशदा संस्थेमार्फत देण्यात येतील.

**F.प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी प्रशिक्षक:-** यशदाचे पालक अधिकारी व संसाधन व्यक्ती प्रशिक्षक म्हणून काम पाहतील.

**G.प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी निधीची उपलब्धता :-** यशदाबाह्य अनिवासी जिल्हा स्तरावरील प्रशिक्षकांचे प्रशिक्षणासाठी यशदाला राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत आर्थिक तरतुदीतून रू -/७५० . पर प्रशिक्षणार्थी पर दिवस याप्रमाणे निधी सामान्य प्रशासन विभागाकडून देण्यात येईल.

४. तसेच,महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम संदर्भातील प्रशिक्षणाची क्षेत्रीय स्तरावरील अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने संबंधितांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

I. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियमाअंतर्गत अधिसुचित केलेल्या सेवांशी निगडीत विभाग /खात्यातील पदनिर्देशित अधिकारी, प्रथम अपिल प्राधिकारी, व्दितीय अपिल प्राधिकारी, सक्षम प्राधिकारी/ कार्यालय प्रमुख यांचे क्षेत्रिय स्तरावर प्रत्यक्ष प्रशिक्षण यशदा मार्फत विकसित केलेल्या प्रशिक्षण संस्था/ खात्यांच्या प्रशिक्षकांच्या मार्फत घेण्यात यावे.

II. क्षेत्रीय प्रशिक्षणासाठी नामनिर्देशने देण्याची जबाबदारी जिल्हा स्तरावरील विभाग /खाते /कार्यालये प्रमुख यांची राहील. नामनिर्देशनाबाबतचे संनियंत्रण संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी करावी.

III. सदरहू प्रशिक्षण कार्यक्रम एक दिवसीय व अनिवासी स्वरूपाचे राहतील व कार्यक्रम दि. १५.१०.२०१५ ते ३१.१०.२०१५ या पंधरवडयात पूर्ण करण्याची जबाबदारी यशदा,संबधित विभागीय प्रशिक्षण संस्था व जिल्हा प्रशिक्षण केंद्र यांच्या सहाय्यातून संबंधित जिल्हयाचे जिल्हयाधिकारी यांची राहील.

IV. **सदर प्रशिक्षणासाठी निधीची उपलब्धता** सामान्य प्रशासन विभागामार्फत करण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०९३०१८२२२९८९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.09.30 18:46:30 +05'30'

**डॉ.भगवान सहाय**
**अपर मुख्य सचिव (सेवा) , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, विधान भवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद महाराष्ट्र, मुंबई.
६. विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ,सचिवालय, विधानभवन, मुंबई
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२

१०. सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, मंत्रालयीन विभाग
११. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई. *
१२. सर्व विभागीय आयुक्त
१३. महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे-४११ ००७
१४. उपमहासंचालक/संचालक,रा.प्र.नि.मु.यं,यशदा,बाणेर रोड,पुणे-४११ ००७
१५. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-१, मुंबई
१६. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-१, नागपूर
१७. महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-१, मुंबई
१८. महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-१, नागपूर
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे संचालक
२१. सर्व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांचे प्राचार्य / विशेष कार्य अधिकारी / संचालक
२२. यशदाचे सर्व पालक अधिकारी
२३. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालये /प्रशिक्षण संस्था
२४. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर *
२५. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर*
२६. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उपलोकआयुक्त कार्यालय, मुंबई *
२७. संबंधित विभागीय उपसंचालक, शालेय शिक्षण विभाग.
२८. अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
२९. निवड नस्ती-१२-अ, साप्रवि, मंत्रालय, मुंबई-३२
३०. *पत्राने